आदिवासी घटक कार्यक्रम-मुख्य लेखाशीर्ष २२५१, सचिवालयीन-सामाजिक सेवा या अंतर्गत संगणक खर्च (अनिवार्य) या योजनेसाठी सन २०२३-२४ करीता निधी वितरीत करण्याबाबत. (लेखाशीर्ष २२५१ ०५७२)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२३/प्र.क्र.०१/कार्यासन ६**
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२
दिनांक : - २३ मार्च, २०२३.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३. दि.१२.०४.२०२३.
२) आदिवासी विकास विभागाची नस्ती क्र. संगणक-२०२३/प्र.क्र. १८/सं.क.

**प्रस्तावना :-**

आदिवासी विकास (खुद्द) विभागातील संगणक / प्रिंटर्स / स्कॅनर, लॅपटॉप यांच्या देखभाल व दुरुस्तीकरीता झालेल्या खर्चाकरीता सन २०२३-२४ च्या अर्थसंकल्पित तरतुदींतून ५० टक्के निधी वितरीत करण्याबाबत संदर्भाधीन क्र. २ वरील प्रस्तावान्वये वित्त विभागास विनंती करण्यात आली होती. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-४ मध्ये मुख्य लेखाशीर्ष २२५१, सचिवालयीन-सामाजिक सेवा या अंतर्गत संगणक खर्च (अनिवार्य) (लेखाशीर्ष २२५१ ०५७२) या योजनेसाठी वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन आदिवासी विकास (खुद्द) विभागातील संगणक / प्रिंटर्स / स्कॅनर, लॅपटॉप यांच्या देखभाल व दुरुस्तीकरीता झालेल्या खर्चाकरीता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून ५० टक्के मर्यादेत उर्वरीत रु.१.१८ लाख इतका निधी खालीलप्रमाणे वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**(रु.लाखात)**

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष | बाब | सन २०२३-२४ साठी अर्थसंकल्पित तरतूद | यापूर्वी वितरीत निधी | सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| संगणक खर्च | २२५१ ०५७२ | १७, संगणक खर्च | ५.९० | १.७७ | १.१८ |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु.१.१८ लाख (अक्षरी रुपये एक लाख अठरा हजार फक्त) इतका निधी नियंत्रक अधिकारी म्हणून उपसचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई** यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना नियंत्रक अधिकारी यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. १ च्या शासन परिपत्रकांतील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.७६६/२३/व्यय-१४, दि.१४.०८.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

.५ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८१७१७०८१९९३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2023.08.24 13:11:37 +05'30'

( राजेंद्र दे. भवारी )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. अपर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२. उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. कक्ष अधिकारी, रोखशाखा/संगणक कक्ष, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. निवड नस्ती (का-६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.